**सामाजिक न्याय विभागांतर्गत विमुक्त जाती,भटक्या जमातीच्या मुलांकरीता नवीन आश्रमशाळांना (निवासी शाळा) मान्यता देणेबाबत.**

**महाराष्ट्र शासन**
सामाजिक न्याय, सांस्कृतिक कार्य, क्रीडा व विशेष सहाय्य विभाग,
शासन निर्णय क्रमांक :-विभशा-२००२/प्र.क्र.३९/मावक-६,
मंत्रालय विस्तार भवन, मुंबई - ४०० ०३२.

दिनांक :- १६ ऑक्टोबर, २००३.

वाचा :-१) शासन परिपत्रक, समाजकल्याण, सांस्कृतिक कार्य व क्रीडा विभाग क्रमांक व्हीएएस-१०९४/प्र.क्र.९४/मावक-६, दिनांक :- २५ जुलै, १९९५.
२) शासन निर्णय, समाजकल्याण, सांस्कृतिक कार्य व क्रीडा विभाग क्रमांक विभशा-१०९६/प्र.क्र.१७३/मावक-६, दिनांक १८ सप्टेंबर, १९९६.
३) शासन निर्णय, समाजकल्याण, सांस्कृतिक कार्य व क्रीडा विभाग क्रमांक व्हीएएस-१०९५/प्र.क्र.२८/मावक-६, दिनांक :- १५ फेब्रुवारी, १९९७.
४) शासन निर्णय,विमुक्त जाती, भटक्या जमाती, इतर मागासवर्ग व विशेष मागसप्रवर्ग कल्याण विभाग, क्रमांकः- विभशा-११९७/प्र.क्र.१८२/मावक-६, दिनांक १९ मे,१९९९.
५) शासन निर्णय,विमुक्त जाती, भटक्या जमाती, इतर मागासवर्ग व विशेष मागसप्रवर्ग कल्याण विभाग, क्रमांकः- विभशा-१०९९/प्र.क्र.९०/इमाव-२ दिनांक २७ सप्टें,१९९९.
६) शासन पत्र,विमुक्त जाती, भटक्या जमाती, इतर मागासवर्ग व विशेष मागसप्रवर्ग कल्याण विभाग, क्रमांकः- विभशा-१०९९/प्र.क्र.१०८/इमाव-२ दिनांक २९मार्च,२०००.
७) शासन निर्णय, विमुक्त जाती, भटक्या जमाती, इतर मागासवर्ग व विशेष मागसप्रवर्ग कल्याण विभाग, क्रमांकः- विभशा-१०९९/प्र.क्र.९०/इमाव-२ दिनांक २०ऑक्टो,२०००.
८) शासन निर्णय, सामाजिक न्याय, सांस्कृतिक कार्य, क्रीडा व विशेष सहाय्य विभाग क्रमांकः- विभशा-२००२/प्र.क्र.३९/मावक-६, दिनांक :- १५ नोव्हेंबर, २००२.
९) संचालक,विजाभज,इमाव, व विमाप्र कल्याण संचालनालय पत्र क्र.विजाभज/नवीन प्राथ/आशा/०३-०४/२३१४, दि.२९ ऑगस्ट,२००३.

**प्रस्तावना :-** महाराष्ट्रातील विमुक्त जाती भटक्या जमाती या संवर्गातील बरेच लोक आपला उदरनिर्वाह करण्यासाठी एका ठिकाणाहून दुसऱ्या ठिकाणी भटकत असतात. त्यामुळे त्यांच्या मुलांना शिक्षणापासून वंचित राहावे लागते. त्यामुळे या संवर्गातील मुला-मुलींसाठी मोफत निवास, भोजन, शालेय साहित्य व अंथरुण-पांघरुण इत्यादी सोयी उपलब्ध करुन दिल्यास आणि व्यक्तिगत लक्ष दिल्यास

त्यांच्या शिक्षणावर चांगला परिणाम होईल या दृष्टीकोनातून या मुलांसाठी खास स्वतंत्र आश्रमशाळा अनुदान देऊन स्वयंसेवी संस्थांमार्फत सुरु करण्याची योजना सन १९५३-५४ पासून अस्तित्वात आली. विमुक्त जाती भटक्या जमाती कल्याण समितीने केलेल्या शिफारशी, विमुक्त जाती भटक्या जमाती यामध्ये वेळोवेळी समाविष्ट करण्यात आलेल्या जातींची संख्या लक्षात घेता विशिष्ट निकष लावून प्रत्येक वर्षी ठराविक संख्येने व योग्य त्या ठिकाणी निवासी आश्रमशाळा उघडण्यासाठी शासनाने दिनांक १५ फेब्रुवारी, १९९७ अन्वये बृहत आराखडा तयार केलेला होता. सदर बृहत आराखडयानुसार राज्यामध्ये सन १९९५-९६ ते २००२ या सात वर्षात ४८८ प्राथमिक आश्रमशाळा व १७१ माध्यमिक आश्रमशाळा उघडण्याचे निश्चित करण्यात आले. यानुसार शासनाने दिनांक १८ सप्टेंबर, १९९६ व दिनांक १९ मे, १९९९ अन्वये आश्रमशाळा मंजूर केलेल्या आहेत. सन १९९८-९९ व सन १९९९-२००० या वर्षासाठी परवानगी देण्याकरिता मागविलेल्या प्रस्तावांच्या बाबतीत शासनाने यापुढे सुरुवातीला शासन निर्णय निर्गमित न करता संबंधित संस्थाना प्रथम शासनाने ठरविलेल्या निकषानुसार आवश्यक ती व्यवस्था करण्याची सूचना संबंधीत संस्थांना देऊन त्यांची तपासणी करण्यात यावी व तपासणीत त्रुटी आढळणाऱ्या संस्थांना आश्रमशाळा मंजूर करण्यात येऊ नये असा निर्णय दिनांक २७ सप्टेंबर, १९९९ अन्वये घेण्यात आला. या निर्णयाच्या अनुषंगाने दिनांक ४ ऑक्टोबर, १९९९ च्या पत्रान्वये प्राथमिक आश्रमशाळांकरिता ४९ संस्थांना व माध्यमिक आश्रमशाळांकरिता २८ संस्थांना व विशेष मागासप्रवर्गाच्या आश्रमशाळांकरिता ५ संस्थांना इरादा पत्रे दिली होती.

**(अ)** सदरच्या इरादा पत्रांना शासनाने दिनांक २९ मार्च, २००० च्या पत्रान्वये स्थगिती दिली. तद्नंतर सदरची इरादापत्रे शासनाने रद्द करण्याचा निर्णय दिनांक २० ऑक्टोबर, २००० अन्वये घेतला. यानुसार सन १९९८-९९ व सन १९९९-२००० या वर्षा करीता मागविण्यात आलेले सर्व प्रस्ताव रद्द करण्यात आले व तसे सर्व संस्थांना संचालक, विजाभज व विभागीय समाजकल्याण अधिकारी आणि विशेष जिल्हा समाजकल्याण अधिकारी यांचे मार्फत कळविण्यात आले. यामध्ये ज्या संस्थांना इरादपत्रे देण्यात आली होती व नंतर ती रद्द करण्यात आली अशा संस्थाना वेगळा अर्ज करावा लागणार नाही व त्या संस्थांचा विचार गुणवत्तेवर करण्यात येईल असे सर्व संस्थांना कळविण्यात आलेले आहे. बऱ्याच संस्थांनी मा. उच्च न्यायालयात याचिका दाखल केलेल्या होत्या. या याचिकांवर मा. उच्च न्यायालयाने विविध याचिकांमध्ये विविध आदेश दिलेले आहेत. शासन पत्र दिनांक १४ नोव्हेंबर, २००० अन्वये मा. उच्च न्यायालयाने विना अनुदानावर आश्रमशाळा सुरु ठेवलेल्या आश्रमशाळा चालू राहू द्याव्यात, असे संबंधीत जिल्हा समाज कल्याण अधिकारी यांनी कळविले आहे.

**(ब)** शासनाने विशेष मोहिमेअंतर्गत केलेल्या तपासणीनुसार मान्यता रद्द केलेल्या आश्रमशाळांच्या बदल्यात ३९ आश्रमशाळांना परवानगी देण्याकरिता प्रस्ताव सन २००१ मध्ये मागविला होते. तद्नंतर सदर प्रस्ताव मान्यता रद्द केलेल्याऐवजी नवीन आश्रमशाळांकरिता असल्याचे शुध्दीपत्र देण्यात आले. तसेच मान्यता रद्द केलेल्या आश्रमशाळांच्या संस्थांचे अपील शासनाने मान्य करुन त्यांना संधी देण्यात आली. सदरचे प्रस्ताव बृहत आराखडयानुसार मागविले नसल्याने सर्वसाधारण ठिकाणी संस्थानी प्रस्ताव पाठविलेले आहेत. नंतर शासनाने १०० प्राथमिक, ३३ माध्यमिक व १० विशेष मागास

प्रवर्गाच्या आश्रमशाळांना मान्यता देण्याबाबत आणि शासनाने दिनांक १५.११.२००२ च्या शासन निर्णयान्वये यापूर्वीचा बृहत आराखडा रद्द करण्याचा निर्णय घेतलेला आहे.

**(क)** शासनाने आता एकुण २६९ प्राथमिक व १३५ माध्यमिक आश्रमशाळांना मान्यता देण्याचा निर्णय घेतलेला आहे. याचिका क्रमांक ३८०६/२००० मध्ये मा. उच्च न्यायालयाने शासन जेंव्हा आश्रमशाळा मान्यतेचे धोरण पुनर्विलोकीत करेल त्यावेळी अर्ज मागविण्यासाठी जाहिरानामा देण्यात यावा व प्राप्त झालेले सर्व अर्ज गुणवत्तेवर न्यायालयाच्या निर्देशानुसार विचारात घ्यावेत असे आदेश दिलेले आहेत. वरील सर्व बाबी विचारात घेऊन शासन निर्णय दिनांक १५.११.२००२ सुधारीत करुन शासन खालीलप्रमाणे निर्णय घेत आहे.

**शासन निर्णय** :- **(१)** विमुक्त जाती भटक्या जमातीच्या मुलामुलींकरिता २६९ प्राथमिक, १३५ माध्यमिक व विशेष मागास प्रवर्गाच्या मुलामुलींकरिता १० प्राथमिक आश्रमशाळा सुरु करण्याचा निर्णय घेतलेला आहे. या आकडयात शासनाने निर्णय घेतल्यास बदल होऊ शकेल. **(२)** आश्रमशाळा मंजूरी देण्याकरिता जाहिरातीद्वारे अर्ज मागविण्यात येतील व आलेल्या अर्जाचा गुणवत्तेनुसार विचार करुन आश्रमशाळांना मान्यता देण्यात येईल. आश्रमशाळेची ठिकाणे बृहत आराखडयात अंतर्भूत असली तरी मान्यतेच्या निकषानुसार तपासणी करुन आश्रमशाळा मंजूर करण्याबाबत निर्णय घेण्यात येईल. याबाबतचे अधिकार शासनाचे राहतील. यापुढे विमुक्त जाती भटक्या जमातींच्या आश्रमशाळा **निवासी शाळा** म्हणून संबोधण्यात येतील. **(३)** ज्या संस्था कायमस्वरुपी विनाअनुदान तत्वावर आश्रमशाळा चालविण्यास तयार असतील व अशा संस्था आश्रमशाळा चाविण्याकरिता विहित करण्यात आलेले सर्व निकष पूर्ण करीत असतील तर त्यांना कायम स्वरुपी विनाअनुदान तत्वावर आश्रमशाळा चालविण्यास प्राधान्य देण्यात येईल. **(४)** शासनाने मे, २००१ मध्ये मागविलेले प्रस्ताव आता रद्द करण्यात येत आहेत. मे, २००१ मधील जाहिरातीनुसार ज्या संस्थांनी अनामत रक्कमेसह अर्ज केलेला होता, त्यांनी देखील नवीन अर्ज बृहत आराखडयानुसार करणे आवश्यक राहील. तथापि, पुन्हा अनामत रक्कम न भरता भरलेल्या अनामतीच्या चलनाची प्रत अर्जासोबत जोडावी लागेल. **(५)** शासन आता नवीन अटी व शर्तीनुसार अर्ज मागविणार असल्याने शासनाच्या दिनांक २७.९.१९९९ च्या निर्णयाप्रमाणे ज्या संस्थांना इरादा पत्रे देण्यात आली होती व नंतर ती रद्द करण्यात आली अशा संस्थांनी अर्ज करणे आवश्यक राहील. मात्र त्यांना पुन्हा अनामत रक्कम न भरता भरलेल्या अमानतीच्या चलनाची प्रत अर्जासोबत जोडावी लागेल. तसेच ज्या प्रकरणात मा. उच्च न्यायालयाने त्यांचे अर्ज विचारात घेण्याबाबत आदेश दिलेले आहेत अशा संस्थांनी देखील अर्ज करणे आवश्यक राहील व त्यांना पुन्हा अनामत रक्कम न भरता भरलेल्या अनामतीच्या चलनाची प्रत अर्जासोबत जोडावी लागेल. **(६)** सर्व प्राप्त झालेल्या अर्जांची गुणवत्तेनुसार तपासणी मा. उच्च न्यायालयाने दिलेल्या आदेशाप्रमाणे करण्यात येईल.**(७)** ज्या संस्थाच्या अर्जाचा विचार मा. उच्च न्यायालयाच्या आदेशाप्रमाणे करावयाचा आहे, त्याबाबत सदर आदेशांच्या अनुषंगाने तपासणी करण्यात येईल. सदर आदेशांप्रमाणे कार्यवाही करताना वर नमूद केलेल्या अटी, शर्ती तसेच आकृतीबंधात योग्य ती सुधारणा करण्याचे अधिकार शासनास राहतील.

नवीन प्राथमिक / माध्यमिक आश्रमशाळांना परवानगी देतांना सोबत जोडलेल्या **परिशिष्ट - १, २, ३ , ४** मध्ये नमूद केलेल्या अटी व शर्ती आणि सोयी सुविधांच्या अधिन राहून देणेत येईल. सदर अटी व शर्तींमध्ये बदल करण्याचे / वगळण्याचे अधिकार शासनास राहतील. वरीलप्रमाणे अर्ज मागवून आश्रमशाळा मान्यतेची प्रक्रीया सुरु करण्यात येईल. अर्ज मागविण्यासाठी जाहिरात स्वतंत्रपणे देण्यात येईल.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नांवाने,

वैअपारकर

**( वै.अ.पारकर )**
**उप सचिव, महाराष्ट्र शासन**

**प्रति,**
संचालक, विमुक्त जाती, भटक्या जमाती, इतर मागासवर्ग आणि विशेष मागास प्रवर्ग संचालनालय, पुणे.
सर्व विभागीय समाजकल्याण अधिकारी,
सर्व विशेष जिल्हा समाजकल्याण अधिकारी,
सर्व शिक्षणाधिकारी, जिल्हा परिषद,
सर्व शिक्षणाधिकारी (प्राथमिक / माध्यमिक), जिल्हा परिषद,
शालेय शिक्षण विभाग, मंत्रालय, मुंबई.
नियोजन विभाग, मंत्रालय, मुंबई.
वित्त विभाग, मंत्रालय, मुंबई.
मा. मुख्यमंत्री यांचे प्रधान सचिव,
मा. मुख्य सचिव यांचे उपसचिव
मा. मंत्री (विजाभज) यांचे खाजगी सचिव
मा. राज्यमंत्री (विजाभज) यांचे खाजगी सचिव
प्रधान सचिव, सामाजिक न्याय, यांचे स्वीय सहाय्यक
निवड नस्ती, का. मावक ६.

**महाराष्ट्र शासन**
**विमुक्त जाती, भटक्या जमाती व विशेष मागास प्रवर्ग**
**कल्याण संचालनालय, ३ चर्च रोड, पुणे-१**
*******

**नवीन प्राथमिक/माध्यमिक विजाभज आश्रमशाळा मंजुरीबाबत जाहिरात**

---

महाराष्ट्र शासनाच्या वि.जा.भ.ज., वि.मा.प्र. कल्याण संचालनालय, पुणे हे २६९ प्राथमिक व १३५ माध्यमिक नवीन आश्रमशाळा तसेच वि.मा.प्र.या वर्गासाठी १० प्राथमिक आश्रमशाळा मंजूर करण्यासाठी अर्ज मागवित आहेत.

* अर्जाचा विहित नमुना (अटी व शर्तीच्या परिशिष्टासह) विशेष जिल्हा समाजकल्याण अधिकारी यांच्या कार्यालयात कार्यालयीन कामकाजाच्या दिवशी व वेळेत उपलब्ध होईल.

* प्राथमिक व माध्यमिक वि.जा.भ.ज. आश्रमशाळेसाठी अर्जाचे स्वतंत्र नमुने ठेवलेले आहेत.
* प्राथमिक आश्रमशाळेसाठी बृहत आराखडयातील गावांसाठीच अर्ज करावा लागेल व माहिती संबंधित विशेष जिल्हा समाजकल्याण अधिकारी यांचेकडे उपलब्ध होईल.

* माध्यमिक आश्रमशाळेबाबत ३ प्राथमिक (७ व्या इयत्तेपर्यंत) विकसित झालेल्या शाळेमधून गुणवत्तेनुसार १ माध्यमिक आश्रमशाळा मंजूर करण्यात येईल.

* मे २००१ मधील जाहिरातीनुसार किंवा इतर वेळी ज्या संस्थांनी अनामत रकमेसह अर्ज केलेला होता किंवा ज्यांना इरादा पत्रे दिली गेली होती, त्यांनी देखील नवीन अर्ज करणे आवश्यक राहील. मात्र त्यांनी पूर्वी भरलेल्या अनामतीच्या चलनाची प्रत अर्जासोबत जोडावी.

* यापूर्वी आश्रमशाळा मंजुरीबाबत ज्या संस्थांनी मा. उच्च न्यायालयात याचिका दाखल केलेल्या होत्या त्या याचिकांमध्ये मा. उच्च न्यायालयाने जे आदेश दिले आहेत त्या आदेशानुसार अर्जावर निर्णय घेण्यात येईल व त्याकरिता गरज भासल्यास अटी शर्तीमध्ये योग्य ती सुधारणा करणेत येतील. अशा संस्थानीही अर्ज सादर करावेत व त्यांनी यापूर्वी अनामत रक्कम चलनाद्वारे भरली असल्यास पुन्हा भरण्याची आवश्यकता राहणार नाही. त्यांनी अनामत रक्कमेच्या चलनाची प्रत अर्जासोबत जोडावी.

आवश्यक कागदपत्रांसह परिपूर्ण अर्ज दिनांक ०७.११.२००३ रोजी कार्यालयीन वेळेत संध्या ५.४५ पर्यंत सादर करावेत. त्यानंतर आलेले अर्ज स्विकारले जाणार नाहीत.

**संचालक,**
**वि.जा.भ.ज., इ.मा.व. व वि.मा.प्र. कल्याण**
**संचालनालय, म.रा., पुणे-१**

# महाराष्ट्र शासन

## विमुक्त जाती, भटक्या जमाती, व विशेष मागास प्रवर्ग
## कल्याण संचालनालय, ३ चर्च रोड, पुणे-१

*******

## नवीन " प्राथमिक आश्रमशाळा" मंजुरीबाबत अर्ज सादर करण्यापूर्वी पुढील सूचना काळजीपूर्वक वाचाव्यात.

*******

*  भटके व विमुक्त समाजातील मुलामुलींना आश्रमशाळातून दर्जेदार शिक्षण आणि उत्कृष्ट निवासी सोयी सुविधा उपलब्ध करुन देऊ शकणा-या स्वयंसेवी संस्थांना, आश्रमशाळा सुरु करण्यासाठी मान्यता देण्यात येईल. विजाभज समूहातील या विद्यार्थ्यांना समाजाच्या मुख्य प्रवाहात आणण्याची संधी स्वयंसेवी संस्थांच्या सहकार्याने व शासनाच्या सक्रीय मदतीने उपलब्ध करुन देण्यात येत आहे. यापुढे सदर आश्रमशाळांना निवासी शाळा म्हणून संबोधण्यात येईल.

सर्व अटी, शर्ती, नियमांची पूर्तता करणा-या,निवासी विद्यार्थ्यांना सर्व सोयी पुरविण्याची क्षमता असलेल्या आणि दर्जेदार व उच्च दर्जाची गुणवत्ता टिकविणा-या स्वयंसेवी संस्थांना शाळा मंजूरीची शासनाची भूमिका राहील. अनुदानित संस्थांच्या भूमिकेशी अनुरुप स्वयंसेवी संस्थांनी उत्तम तऱ्हेने शाळा चालविण्याकरिता पूर्णपणे शासन निधीवर अवलंबून न राहता काही प्रमाणात स्वतःहून खर्च करण्याची तयारी ठेवावी.

१. अर्ज सुवाच्च्य अक्षरात व सुस्पष्ट असावा. अर्जातील माहिती टंकलिखीत स्वरुपात चालू शकेल, तथापि आवश्यक तेथे संस्थेने प्राधिकृत केलेल्या पदाधिकाऱ्याची सही, नांव, दिनांक व शिक्का असावा.

२. अर्जातील कोणताही रकाना रिक्त ठेवू नये, मोघम माहिती देऊ नये.

३. अर्जातील सर्व माहिती,(परिशिष्टे) अटी, शर्ती, निकषाचे काळजीपूर्वक वाचन करावे. सदर माहिती परिशिष्ट १ ते ९ येथे जोडले आहे.

४. अर्जासोबत आवश्यक ती सर्व कागदपत्रे साक्षांकित करुन जोडणे आवश्यक आहे.

५. जाहिरातीत विहित केलेल्या मुदतीत कार्यालयीन वेळेत संबंधित विशेष जिल्हा समाज कल्याण अधिकारी यांच्या कार्यालयात अर्ज सादर करावा. उशीरा दाखल झालेले अथवा अपूर्ण अर्ज विचारात घेतले जाणार नाहीत.

६. अर्ज भरताना माहिती देण्यासाठी रकान्यातील जागा अपूरी पडल्यास अतिरिक्त पृष्ठ जोडून माहिती द्यावी व पुढील पृष्ठ क्र. क्रमाने द्यावा.

७. जो मजकूर लागू नाही तो स्पष्टपणे " लागू नाही " असे लिहावे.

८. मे २००१ मधील जाहिरातीनुसार किंवा इतर वेळी ज्या संस्थांनी अनामत रकमेसह अर्ज केलेला होता किंवा ज्यांना इरादा पत्रे दिली गेली होती, त्यांनी देखील नवीन अर्ज करणे आवश्यक राहील. मात्र त्यांनी पूर्वी भरलेल्या अनामतीच्या चलनाची प्रत अर्जासोबत जोडावी.

९. अर्जाची तपासणी मा. उच्च न्यायालय यांनी वेळोवेळी दिलेल्या निदेशाप्रमाणे करण्यात येईल.

१०. संस्थेने अर्ज मुला-मुलींसाठीआश्रमशाळा सुरु करण्याबाबत अर्जात स्पष्ट उल्लेखकरावा.

११. यापूर्वी आश्रमशाळा मंजुरीबाबत ज्या संस्थांनी मा. उच्च न्यायालयात याचिका दाखल केलेल्या होत्या त्या याचिकांमध्ये मा. उच्च न्यायालयाने जे आदेश दिले आहेत त्या आदेशानुसार अर्जावर निर्णय घेण्यात येईल व त्याकरिता गरज भासल्यास अटी शर्तीमध्ये योग्य ती सुधारणा करणेत येतील. अशा संस्थानीही अर्ज सादर करावेत व त्यांनी यापूर्वी अनामत रक्कम चलनाद्वारे भरली असल्यास पुन्हा भरण्याची आवश्यकता राहणार नाही. त्यांनी अनामत रक्कमेच्या चलनाची प्रत अर्जासोबत जोडावी अशा संस्थांना त्यांच्या संबंधात मा.उच्च न्यायालय यांनी जे आदेश दिले असतील व त्यासंदर्भात जी कार्यवाही झाली असेल त्याबाबतची सर्व माहिती व भूमिका अर्जासोबत जोडावी.

१२. विशेष मागास प्रवर्गाच्या १० प्राथमिक आश्रमशाळांसाठी फक्त खालील १० जिल्हयांत अर्ज करता येईल. (१) चंद्रपुर (२) गडचिरोली (३) भंडारा (४) यवतमाळ (५) नागपूर (६) सोलापूर (७) ठाणे (८) गोंदिया (९) कोल्हापूर (१०) रायगड

१३. अटी व शर्तीमध्ये बदल करण्याचा, वगळण्याचा शासनाचा निर्णय अंतिम राहील.

***

# महाराष्ट्र शासन

## विमुक्त जाती, भटक्या जमाती, इतर मागास वर्ग व विशेष मागास प्रवर्ग कल्याण संचालनालय, ३ चर्च रोड, पुणे-१

## स्वयंसेवी संस्थेमार्फत राज्यात विमुक्त जाती भटक्या जमातीच्या मुलामुलींसाठी नवीन सुरु करावयाच्या प्राथमिक आश्रमशाळा

## अर्जाचा विहीत नमुना

---

**(कार्यालयीन उपयोगासाठी)**

अर्ज क्रमांक____________ दिनांक :- ______________

पान क्र. ________ते________३

चलन क्रमांक________________ अनामत रक्कम रुपये ____________

शाळेचा प्रकार प्राथमिक-मुलांची/मुलींची/मुला-मुलींची

---

**संस्थेने भरण्यासाठी**

| अ.क्र. | बाब | माहिती |
|---|---|---|
| **१** | **२** | **३** |
| १ | संस्थेचे नांव व पूर्ण पत्ता (पीनकोड क्रमांक व दूरध्वनी क्रमांक असल्यास त्यासह) | -- |
| २ | नियोजित प्राथमिक आश्रमशाळेचे नांव व पूर्ण पत्ता | -- |
| ३ | संस्था पंजीबध्द क्रमांक व दिनांक | |
| | अ) सार्वजनिक विश्वस्त अधिनियम १९५० | |
| | ब) संस्था नोंदणी अधिनियम १८६० | |

| | | |
|---|---|---|
| ४ | संस्थेची लिखीत घटना, त्यातील पदाधिकारी, संस्थेची ध्येय धोरणे ही मा.धर्मादाय आयुक्तांनी (बदल असल्यास फेरफारासह) मंजूर केली आहे काय ?<br>अद्यावत साक्षांकित प्रत जोडावी. | |
| ५ | मुलींच्या शाळेचा प्रस्ताव आहे काय ? | |
| ६ | प्राथमिक आश्रमशाळेसाठीरु.१०००/- व माध्यमिक आश्रमशाळेसाठी रु. ५०००/- अनामत रक्कम चलनाने भरली आहे काय ? भरली असल्यास प्रत जोडावी. (यापूर्वी अनामत रक्कम भरली असल्यास त्याची प्रत सोबत जोडावी). | |
| ७ | अर्ज करतेवेळी संस्थेचे बँक खात्यात रु.१.०० लक्ष जमा असणे आवश्यक याबाबत संबंधित बँकेच्या शाखाधिका-यांचे जमा रकमेबाबतचे प्रमाणपत्र सोबत जोडावे. | |
| ८ | यापूर्वी संस्थेच्या आश्रमशाळा मंजुरी संदर्भात मा. न्यायालयाने काही निर्णय व आदेश दिलेले आहेत काय ? असल्यास त्याबाबत याचिका क्रमांक, दिनांक व निर्णयाच्या दिनांक प्रतीसह तपशिल देवून अंतीम/अंतरिम आदेशाची प्रत जोडावी व त्याबाबत आपल्या भूमिकेची सविस्तर माहिती द्यावी. | |
| | याचिका क्रमांक | |
| | निर्णय दिनांक | |
| | तपशिल | |
| ९ | मागील दोन वर्षातील (२००१-२००२ आणि २००२.२००३) नोंदणीकृत सनदी लेखापालाने संस्थेचे केलेले लेखा परिक्षणाचे अहवाल सोबत जोडण्यात आले आहेत काय ? | |
| १० | संस्थेचे पदाधिकारी व कार्यकारिणीचे सदस्य यांची नांवे, पूर्ण पत्ते, व्यवसाय, जात इ. बाबत संबंधितांच्या स्वाक्षरीसह पूर्ण माहिती | |
| ११ | संस्थेतील कोणत्याही पदाधिका-यास व कार्यकारी मंडळातील सदस्यास भारतीय दंड संहितेतील तरतूदीनुसार | |

| | | |
|---|---|---|
| | गुन्हयाबाबत शिक्षा झालेली आहे काय ? असल्यास सविसस्तर माहिती द्यावी. | |
| १२ | संस्थेमार्फत राबविण्यात येणाऱ्या केंद्र व राज्य शासनाच्या उपक्रमांची माहिती देण्यात यावी. | |
| १३ | शासनाकडून किंवा स्थानिक स्वराज्य संस्थेकडून यापूर्वी संस्थेच्या इतर उपक्रमामध्ये अनियमितता किंवा गैरव्यवहार बाबत गुन्हा दाखल झाला आहे काय किंवा दंडात्मक कारवाई झालेली आहे काय ? असल्यास सविसस्तर माहिती द्यावी. | |
| १४ | वरील क्र. १३ मधील प्रकल्पाबाबत सदर प्रकल्प उत्कृष्ट वा समाधानकारक सुरु आहेत याबाबतच्या कांही नोंदी आहेत काय ? असल्यास त्याबाबत परिशिष्ट ७ मध्ये स्वतंत्र नोंदी पुराव्यासह द्याव्यात. | |
| १५ | संस्था स्वतःच्या मालकीची किंवा खरेदी करुन, दानपत्राने, शासकीय, किमान ३ एकर जमीन, मंजुरीनंतर २ वर्षात उपलब्ध करुन देऊ शकेल काय ? (संस्थेकडे सध्या जमीन असल्यास ७/१२ उता-यासह माहिती द्यावी.) | |
| १६ | आश्रमशाळा मान्यतेनंतर निवासी/ अनिवासी विद्यार्थ्यांना सर्व सोयी सवलती कालबध्दतेनुसार उपलब्ध करुन देण्याबाबत परिशिष्ट २-३-४ मधील अटी व शती मान्य आहेत काय ? | |
| १७ | राज्य शासनाच्या प्रचलित धोरणानुसार शिक्षक/शिक्षकेतर कर्मचा-यांच्या नेमणुका, सेवा विषयक बाबी, अनुदानाचे सूत्र, शैक्षणिक धोरणाबाबतचे वेळोवेळी शासकीय आदेश मान्य असल्याबाबत परिशिष्ट ८ मधील करारनाम्यात उल्लेख केला आहे काय? | |
| १८ | संस्थेचे २०/- रु. स्टॅम्प पेपरवरील करारपत्र जोडले आहे काय | |
| १९ | संस्थेने प्रतिज्ञापत्र जोडले आहे काय ? | - |
| २० | संस्थेकडे सध्या उपलब्ध असलेल्या पायाभूत सोईसुविधांची माहिती देण्यात यावी. | |

दिनांक :- **सही**

ठिकाण **:-** **शिक्का**

# परिशिष्ट - १

## आश्रमशाळा मंजुरीबाबत पात्रतेच्या अटी

१. शाळा चालवू इच्छिणारी संस्था, संस्था अधिनियम १८६० आणि महाराष्ट्र सार्वजनिक विश्वस्त अधिनियम १९५० नुसार नोंदणीकृत असणे आवश्यक आहे.

२. संस्थेच्या ध्येयधोरणामध्ये निवासी आश्रमशाळा चालविण्याची स्पष्ट तरतूद असावी आणि घटनेची प्रत धर्मादाय आयुक्तांनी मान्य केलेली असावी.

३. अर्ज करताना संस्थेने प्राथमिक आश्रमशाळेसाठी रु.१०००/- व माध्यमिक आश्रमशाळेसाठी रु. ५०००/- चलनाव्दारे भरणे आवश्यक आहे.

४. संस्था मंजुरीसाठी अर्ज करताना, संस्थेच्या खात्यामध्ये रु. १.०० लक्ष जमा असणे आवश्यक आहे. यासाठी बँकेच्या शाखाधिका-याचे बँक बॅलन्स प्रमाणपत्र सादर करावे.

५. मे २००१ च्या जाहिरातीनुसार ज्या संस्थांनी यापूर्वी अर्ज दिला आहे किंवा ज्यांनाइरादापत्रे दिली होती व त्यांनी चलनाने रक्कम भरली असेल तर पुन्हा अनामत रक्कम भरण्याची गरज नाही. तथापि पुन्हा अर्ज करणे बृहत आराखडयानुसार आवश्यक आहे व अर्जासोबत पूर्वी भरलेल्या चलनाची प्रत जोडण्यात यावी.

६. यापूर्वी आश्रमशाळा मंजुरीबाबत ज्या संस्थांनी मा. उच्च न्यायालयात याचिका दाखल केलेल्या होत्या त्या याचिकांमध्ये मा. उच्च न्यायालयाने जे आदेश दिले आहेत त्या आदेशानुसार अर्जावर निर्णय घेण्यात येईल व त्याकरिता गरज भासल्यास अटी शर्तीमध्ये योग्य ती सुधारणा करणेत येतील. अशा संस्थानीही अर्ज सादर करावेत व त्यांनी यापूर्वी अनामत रक्कम चलनाद्वारे भरली असल्यास पुन्हा भरण्याची आवश्यकता राहणार नाही. त्यांनी अनामत रक्कमेच्या चलनाची प्रत अर्जासोबत जोडावी म्हणून ज्या संस्थांना त्यांच्या संबंधात मा.उच्च न्यायालय यांनी जे आदेश दिले असतील व त्यासंदर्भात कार्यवाही झाली असेल त्याबाबतची सर्व माहिती व भूमिका अर्जासोबत जोडावी.

७. संस्थेच्या लिखीत आणि धर्मदाय आयुक्तांनी मान्य केलेल्या घटनेमध्ये संस्थेचे कार्यक्षेत्र जेवढे असेल तेवढया कार्यक्षेत्रापुरतेच नवीन आश्रमशाळा मान्यतेबाबत विचार होईल.

८. विमुक्त जाती व भटक्या जमातीच्या संस्थांना आश्रमशाळा मान्यता देताना प्राधान्य देण्यात येईल. तसेच विशेष मागासप्रवर्गाच्या आश्रमशाळांना मान्यता देताना विशेष मागासप्रवर्गाच्या संस्थांना प्राधान्य देण्यात येईल.

९. संस्थेतील कोणत्याही सदस्यास भारतीय दंड संहितेतील तरतुदीनुसार गुन्हयाबाबत शिक्षा झालेली नसावी.

१०. शासनाकडून यापूर्वी संस्थेच्या इतर उपक्रमामध्ये अनियमितता किंवा गैरव्यवहार बाबत गुन्हा दाखल झालेला नसावा किंवा दंडात्मक कार्यवाही नसावी.

११. शासनाने गठीत केलेल्या समितीने छाननी केल्यानंतर अंतीम मंजूरीबाबत निर्णय घेण्यात येईल.

***

# परिशिष्ट-२

## इतर आवश्यक अटी व शर्ती

### सर्वसाधारण अटी

१. आश्रमशाळा चालविताना शासनाने विहीत केलेले निकष, अटी व शर्ती यांचे पालन काटेकोरपणे करणे बंधनकारक राहील.

२. केंद्र व राज्य शासनाच्या महिला विषयक धोरणानुसार आश्रमशाळेमध्ये निवासी /अनिवासी मुलींचे प्रमाण ३० टक्के राहील. मुलींच्या आश्रमशाळा स्थापन करण्याकरिता परवानगी दिली जाईल. मुलींच्या आश्रमशाळांना प्रोत्साहन देण्याकरिता शासन प्रयत्नशील राहील.

३. केंद्र शासनाच्या अपंग व्यक्ती (समान संधी, हक्काचे संरक्षण आणि समान सहभाग) अधिनियम १९९५ नुसार कमीत कमी ३ टक्के अपंग विद्यार्थ्यांना प्रवेश द्यावा.

४. विहीत नमुन्यात केलेले अर्ज शैक्षणिक वर्षापुरतेच विचारात घेतले जातील.

५. शासनाकडून विहीत करणेत येत असलेल्या सूत्रानुसार आश्रमशाळांना अनुदान अनुज्ञेय राहील. यानंतर वेळोवेळी जो अनुदानात बदल होईल तो सर्वांना बंधनकारक राहील. आश्रमशाळेकरिता मान्यता सचिव समितीच्या मान्यतेनंतर दिली जाईल. संस्थेस लेखा परिक्षणाच्या व वार्षिक तपासणी व मूल्यमापनाच्या अहवालाच्या आधारे, निधीच्या उपलब्धतेनुसार संस्थेच्या मंजूर झालेल्या आश्रमशाळेस अनुदान देण्यात येईल.

६. मा. उच्च न्यायालय, खंडपीठ औरंगाबाद यांचे निर्देशानुसार सामाजिक न्याय विभागांतर्गत सर्व संस्थांची (विजाभज,अपंग कल्याण, मागासवर्ग कल्याण इ.) तपासणी त्रयस्थ संस्थेकडून करण्यात आलेली आहे. योग्य त्या त्रयस्थ संस्थेमार्फत परवानगी द्यावयाच्या नवीन आश्रमशाळांची सुध्दा तपासणी करण्यात येईल व त्यांच्या मध्ये अनियमितता व त्रुटी आढळल्यास प्रकरणाच्या स्वरुपानुसार फौजदारी गुन्हे दाखल करणे, संस्था बंद करणे, अनुदानात कपात करणे व दंड करणे इ. कारवाई करण्यात येईल.

७. पात्रतेच्या व इतर आवश्यक अटी व शर्ती पूर्ण करतील आणि याबाबत हमी देतील त्यांच्याच अर्जांचा विचार होईल.

८. बृहत आराखडयामध्ये जी गावे निश्चित केलेली आहेत. त्या ठिकाणीच अर्ज करावा लागेल व अर्ज संबंधित जिल्हा समाजकल्याण अधिकारी यांचे कार्यालयात उपलब्ध होतील. जरी ठिकाणाचा समावेश बृहत आराखडयात झालेला असला तरी मान्यता देतेवेळी १० कि.मी. अंतरावर वि.जा.भ.जमातीची दुसरी आश्रमशाळा असणार नाही व त्या परिसरातील वि.जा.भ.जमातीची अंदाजित लोकसंख्या १०००० असेल या निकषानुसार मान्यतेचा विचार करण्यात येईल.

९. पिण्याचे पाणी, आरोग्य याबाबत राज्य शासनाने वयोगटानुसार पिण्याचे व वापरण्याचे पाणी पुरविण्याबाबत जे निकष ठरवून दिलेले आहेत त्याचेच पालन करावे लागेल.

१०. आश्रमशाळा मंजूरीनंतर नवीन शैक्षणिक वर्ष जून २००४ पासून सुरु होईल , तत्पुर्वी मान्यतेनंतर विहीत सोयी उपलब्ध करुन देणे संस्थेवर बंधनकारक राहील. याबाबतची तपासणी एप्रिल २००४ पूर्वी करुन सदर तपासणीमध्ये विहित सोई उपलब्ध करुन दिल्याची खात्री झाल्यानंतरच वर्ग सुरु करण्यास परवानगी दिली जाईल. जर जून, २००४ या शैक्षणिक वर्षाच्या सुरुवातीला सदर सोई सुविधांची पूर्तता झाली नाही तर आश्रमशाळा शैक्षणिक वर्ष जून, २००५ पासन सुरु करण्यास सोई सुविधेच्या अधिन राहून परवानगी देण्यात येईल.

११ प्रतिज्ञापत्रामध्ये अर्जातील एकूण पाने म्हणजेच पान क्र. ____ ते ____आणि जोडपत्रे _____ ते ______ याचा स्पष्ट उल्लेख असावा.

१२. नवीन आश्रमशाळा सुरु कराण्याच्या अर्जावर शासनाचा निर्णय अंतिम राहील. योग्य त्या कारणासाठी अटी व शर्ती शिथिल करण्याचे अधिकार शासनाला राहतील.

१३. प्रत्येक वर्गात यापूर्वीच्या नियमानुसार निवासी विद्यार्थ्यांना प्रवेश देण्यात यावा. यामध्ये वाढ करण्याबाबत शासन स्तरावर निर्णय झाल्यास त्याप्रमाणे प्रवेश देणे बंधनकारक राहील.

१४. सदर जाहिरातीनुसार मागविण्यात आलेले प्रस्ताव कोणत्याही सबबी विना रद्द करण्याचे अधिकार शासनाकडे राहतील.

***

# परिशिष्ट - ३

## आश्रमशाळांमध्ये पुरवावयाच्या सोयी व सुविधा
## पिण्याचे व वापरावयाचे पाणी आणि आरोग्य

१. विद्यार्थ्यांसाठी शुध्द पिण्याचे पाणी उपलब्ध ठेवावे लागेल. त्यासाठी बोअरवेल अथवा नळ योजनेचा वापर करावा. तसेच पिण्याचे पाणी साठविणेसाठी टाकी आवश्यक आहे.
२. पिण्याचे पाणी साठविणेसाठी ठेवलेल्या टाक्यांची स्वच्छता नियमितपणे करणे बंधनकारक असून नोंदवहीत तारीखनिहाय त्याची नोंद घेणे आवश्यक राहील.
३. स्वच्छता व आरोग्य याबाबत संस्थेने काळजी घेणे आवश्यक आहे. अन्न व पिण्याचे पाणी याबाबत स्वच्छता न पाळल्यास व पिण्याचे पाण्यातून किंवा अन्नामधून आरोग्याचे दृष्टिने विषबाधा इत्यादि सारखे अपघात झाल्याचे आढळून आल्यास संस्था चालक आणि संबंधित कर्मचारी यांचे विरुध्द फौजदारी गुन्हे नोंदविले जातील.
४. आश्रमशाळेचा शालेय व निवासी परिसर स्वच्छ ठेवावा लागेल.
५. विद्यार्थ्यांच्या आरोग्याच्या दृष्टिने वर्षातून दोनदा प्रत्येक विद्यार्थ्यांची आरोग्य तपासणी होणे आवश्यक आहे.
६. संस्थेने प्राथमिक उपचार पेटी ठेवणे बंधनकारक असून साथीचे आजार पसरल्यास त्वरित नजिकच्या वैद्यकीय केंद्रास/जिल्हा कार्यालयास कळवून उपचार सुरु करणे बंधनकारक राहील.
७. पाणी पुरविण्याबाबत शासनाचे जे निकष असतील त्याप्रमाणे पाणी पुरविण्यात यावे.

### वीज पुरवठा

१. आश्रमशाळेतील विद्यार्थ्यांना रात्री अभ्यास करण्यासाठी पुरेसा वीज पुरवठा आवश्यक असल्यामुळे भरपूर उजेडासाठी टयूब्स लावणे आवश्यक राहील.
२. आश्रमशाळेच्या आवारात रात्रीचे वेळेस पुरेसा प्रकाश ठेवण्यासाठी आवारामध्ये टयूब्स व अन्य दिवे लावण्याची तरतूद आवश्यक आहे.
३. ग्रामीण भागात वीजेचा पुरवठा वारंवार खंडीत होतो हे लक्षात घेवून संचालकांनी शाळेमध्ये सुयोग्य पर्यायी व्यवस्था करणे आवश्यक आहे.

### संरक्षण कुंपण

१. आश्रमशाळेच्या संरक्षणासाठी त्याचप्रमाणे अतिक्रमण होवू नये यासाठी आश्रमशाळे भोवती संरक्षक भिंत/तार कपाऊंड आवश्यक राहील. सुरवातीस तार कपाऊंड तरी करावे लागेल व तद्नंतर दोन वर्षांच्या कालावधीमध्ये विटा व सिमेंटची भिंत बांधावी लागेल.

२. आश्रमशाळेच्या दर्शनी भागात लोखंडी प्रवेश व्दार आवश्यक राहील.

**<u>क्रिडांगण - क्रिडा विषयक</u>**

१. आश्रमशाळेच्या परिसरामध्ये क्रिडांगणासाठी मोकळी व भव्य जागा उपलब्ध करुन देणे आवश्यक आहे.
२. विद्यार्थ्यांच्या वयोगटानुसार वेगवेगळया खेळाची मैदाने उदा.- कबड्डी, लंगडी, खो खो, इ. असावीत.
३. प्राथमिक आश्रमशाळेच्या बाबत वयोगट ६ ते ९, १०ते१२, १२ते१४ नुसार वेगवेगळया खेळाचे साहित्य उपलब्ध करुन द्यावे लागेल.
४. लहान विद्यार्थ्यांसाठी घसरगुंडी यासारखी बालोद्यानाची इत्यादि साधने उपलब्ध करुन द्यावी लागतील.
५. क्रिडाविषयीचे शासनाकडून वेळोवेळी ठरविण्यात आलेले निकष संस्थेवर बंधनकारक राहतील व त्या प्रमाणेच सुविधा उपलब्ध करुन द्याव्या लागतील.

**<u>विद्यार्थ्यांना द्यावयाचे भोजन</u>**

१. आश्रमशाळेतील निवासी विद्यार्थ्यांना सकाळी ६ ते ६.३० वाजता दूध, नाष्ता, ९.०० ते १०.०० सकाळचे जेवण, दुपारी २.३० ते ३.०० वाजता अनिवासी विद्यार्थ्यांसह दुपारचा नाष्टा आणि सायंकाळी ६.०० ते ७.३० वाजता निवासी विद्यार्थ्यांना जेवण देण्यात यावे.
२. स्वयंपाकासाठी, वाढण्यासाठी व जेवणासाठी वापरण्यात येणारी भांडी स्वच्छ राहतील याची दक्षता घेणे आवश्यक राहील.
३. जेवणात वरण, भात, भाजी, गव्हाची पोळी, ज्वारी बाजरीची भाकरी यांचा समावेश राहील. राष्ट्रीय सण आणि इतर सणाचे दिवशी जेवणामध्ये एखादा गोड पदार्थ राहील.
४. जेवण/नाष्ता तयार झाल्यावर संस्थेच्या अधिक्षकाने त्याची चव घेणे आवश्यक असून तशी नोंद दैनंदिन चव रजिस्टरमध्ये घेणे बंधनकारक राहील.

६. स्वयंपाकाची , वाढवण्याची सर्व आवश्यक भांडी व प्रत्येक निवासी विद्यार्थ्यांस स्टेनलेस स्टीलचे प्रत्येकी ताट, वाटी, ग्लास व आंघोळीसाठी ५ विद्यार्थ्यांसाठी १ बादली व १ मग इ. पुरविणे संस्थेवर बंधनकारक राहील.

७. जेवणाच्या बाबतीत सविस्तर आदेश शासनाकडून वेळोवेळी देण्यात येतील व त्याप्रमाणे जेवण पुरविणे बंधनकारक राहील.

## निवासी विद्यार्थ्यांना गणवेश व इतर शालेया साहित्य

१. विद्यार्थ्यांना वर्षाच्या सुरुवातीस एक जोडी गणवेश, लोखंडी कॉटस, लोखंडी कपाट, उशी, चादर, ब्लँकेट इ. सोयी पुरविणे संस्थेवर बंधनकारक राहील.

२. वर्गात अभ्याक्रमानुसार क्रमिक पुस्तके, वहया, बसण्यासाठी पटटया, क्रमाक्रमाने डेस्क बेंचेस इ. आवश्यक शैक्षणिक साहित्य पुरविणे संस्थेवर बंधनकारक राहील.

३. शैक्षणिक धोरणानुसार इतर सर्व साहित्य पुरवणे आवश्यक राहील.

## तपासणी/कर्मचा-यांच्या नेमणुका/अनुदानाची सूत्रे इ.

१. आश्रमशाळेची तपासणी करण्यासाठी मा. उच्च न्यायालयाने यापूर्वी वेळोवेळी दिलेल्या आदेशाचे पालन करुन राज्य शासनाच्या विमुक्त जाती भटक्या जमाती विभागाच्या आणि शैक्षणिक बाबीसाठी शिक्षण विभागाचे अधिकारी संस्थेची तपासणी करतील.

२. संस्थेच्या तपासणीमध्ये उणिवा, दोष, आर्थिक अनियमितता इत्यादि बाबी आढळून आल्यास संस्थेविरुध्द अनियमिततेचे स्वरुप लक्षात घेऊन नियमानुसार कारवाई करण्यात येईल.

३. संस्थेस नियमाप्रमाणे आवश्यक असणारे शिक्षक व शिक्षकेतर कर्मचा-यांच्या नेमणुका राज्य शासनाकडुन विहित करावयाच्या प्रचलित नियमानुसार करण्यात याव्यात.

४. आश्रमशाळेतील विद्यार्थ्याच्या गळतीचे प्रमाण राहणार नाही यासाठी इ. १ली त झालेले प्रवेशित विद्यार्थी जास्तीत जास्त संस्थेने इ. ४ थी, ७ वी व १० वी पर्यंत शिक्षण घेतील याबाबत संस्थेने काळजी घ्यावी.

५. राज्य शासन ठरविल त्यानुसार अनुदानाचे सूत्र राहील.

***

# परिशिष्ट -४

## आश्रमशाळा सुरु करण्यासाठी जमिनीचा शालेय तसेच निवासी इमारतीबाबतचा तपशील

| अ.क्र. | बाब | कालावधी |
|---|---|---|
| १ | २ | |
| १ | आश्रमशाळेसाठी जमीन किमान ३ एकर | २ वर्षे |
| २ | शालेय इमारत स्वत:ची व भाडयाची<br>अ.) शालेय खोली -२० x २० = ४०० चौ. फुट<br>ब.) मुख्याध्यापक खोली - १०'x१२'=१२० चौ.फूट<br>क.) कार्यालय - १०'x१२'=१२० चौ.फूट<br>ड ) -२० x २० = ४०० चौ. फुटाच्या सहा शालेय खोल्या.<br>इ) लायब्ररी / बहुउद्देशीय कक्ष २० x २० | मंजुरी मिळाल्यानंतर शाळा सुरु होण्यापूर्वी<br>मंजुरी मिळाल्यानंतर शाळा सुरु होण्यापूर्वी<br>मंजूरी मिळाल्यानंतर दुस-या वर्षी<br>इ. ७ वीचा वर्ग विकसित होई पर्यंत प्रत्येक वर्षी या प्रमाणे.<br>किमान चौथ्या वर्षी |
| ३ | निवासी इमारत<br>अ) निवासी मुलांमुलांसाठी स्वतंत्र खोल्या<br>५०० चौ. फुट एकूण ३ खोल्या<br>१६० चौ. फुट एकूण ३ खोल्या<br>ब) स्वयंपाक गृह- १ - २० x १५ चौ.फूट<br>क) कोठीगृह -१ - २० x १५ चौ.फूट<br>ड) स्वच्छतागृह / प्रसाधनगृह<br>३ x ४ चौ. फुट एकूण १२ | - पहिल्या वर्षी शाळा सुरु होण्यापूर्वी मुलांसाठी ५०० चौ. फु. ची एक खोली व मुलींसाठी १६० चौ. फु. ची एक खोली भाडयाची अथवा संस्थेच्या मालकीची .<br>- दुस-या वर्षी संस्थेच्या मालकीची ५०० चौ.फु. मुलांसाठी व १६० चौ. फु. मुलींसाठी स्वतंत्र प्रत्येकी १ खोली.<br>- तिस-या वर्षी संस्थेच्या मालकीची ५०० चौ.फु. मुलांसाठी व १६० चौ. फु. मुलींसाठी स्वतंत्र प्रत्येकी १ खोली.<br>- पाचव्या वर्षी संस्थेच्या मालकीची ५०० चौ.फु. मुलांसाठी व १६० चौ. फु. मुलींसाठी स्वतंत्र प्रत्येकी १ खोली.<br>- पहिल्या वर्षी शाळा सुरु होण्यापूर्वी<br>- पहिल्या वर्षी शाळा सुरु होण्यापूर्वी<br>- पहिल्या वर्षी प्रत्येकी २ मुलामुलींसाठी स्वतंत्र शाळा सुरु होण्यापूर्वी |

| | | |
|---|---|---|
| | इ) स्नानगृह<br>४ x ४ चौ. फूट. एकूण १२ | - दुस-या वर्षी प्रत्येकी २ मुलामुलींसाठी स्वतंत्र<br>- तिस-या वर्षी प्रत्येकी २ मुलामुलींसाठी<br>- पहिल्या वर्षी प्रत्येकी २ मुलामुलींसाठी स्वतंत्र शाळा सुरु होण्यापूर्वी<br>-दुस-या वर्षी प्रत्येकी २ मुलामुलींसाठी स्वतंत्र<br>-तिस-या वर्षी प्रत्येकी २ मुलामुलींसाठी स्वतंत्र |

**टिप :- वरील सर्व मुलभूत सुविधा संस्थेच्या मालकीच्या जागेवर पाचव्या वर्षी ३ एकर क्षेत्रावर परिपूर्णपणे विकसित करणे आवश्यक आहे.**

***

## परिशिष्ट - ५

## अर्जासोबत जोडावयाच्या साक्षांकित कागदपत्रांची यादी

| अ.क्र. | कागदपत्रे |
|---|---|
| १ | २ |
| १ | सार्वजनिक विश्वस्त अधिनियम १९५० अन्वये नोंदणी झाल्याची प्रत |
| २ | संस्था नोंदणी अधिनियम १८६० अन्वये नोंदणी झालेबाबत प्रमाणपत्राची प्रत |
| ३ | संस्थेच्या लिखीत घटनेची धर्मादाय आयुक्त यांनी मान्य केलेली प्रत |
| ४ | प्राथमिककरीता रु. १०००/- व माध्यमिककरिता रु.५०००/- अनामत रक्कम चलनाने कोषागारात भरल्याची प्रत (यापूर्वी अनामत रक्कम भरली असल्यास त्याची प्रत. |
| ५ | संस्थेचे बँक खात्यात रु. १.०० लक्ष जमा असल्याबाबत बँकेच्या शाखाधिका-यांच्या पत्राची प्रत. |
| ६ | सन २००१.०२ व २००२.०३ वर्षातील सनदी लेखापालांनी संस्थेच्या केलेल्या लेखा परिक्षणाचे अहवाल. |
| ७ | संस्थेच्या पदाधिकारी व कार्यकारिणीतील सदस्य यांची नांवे, पूर्ण पत्ते, व्यवसाय, जात इत्यादि बाबींची माहिती.(पहा परिशिष्ट ६ ) |
| ८ | संस्थेच्या इतर उपक्रमांची माहिती ( पहा परिशिष्ट-७) तसेच त्यासंदर्भात सदर उपक्रमाच्या कामकाजाच्या बाबतीत झालेली दंडात्मक कार्यवाही , कामाच्या बाबतीत निकृष्ट व उत्कृष्ट शेरे, प्रतवारी इ.ची माहिती द्यावी |
| ९ | यापूर्वी संस्थेच्या अंतर्गत आश्रमशाळा मंजुरी संदर्भात न्यायालयाने कांही निर्णय दिलेला असल्यास त्याबाबत याचिका क्रमांक, दिनांक व निर्णयाची प्रत व संस्थेची भूमिका. |
| १० | संस्थेतील कोणत्याही पदाधिका-यास व कार्यकारिणी मंडळातील सदस्यास भारतीय दंड संहितेतील तरतुदीनुसार गुन्हयाबाबत शिक्षा झालेली त्याबाबतची माहिती. |
| ११ | संस्थेची स्वतःची जागा/जमीन असल्यास ७/१२ चा उतारा. |
| १२ | संस्थेची स्वतःची इमारत असल्यास, मालमत्तेबाबत उतारा. |
| १३ | इमारत भाडयाची असल्यास, मालकाचे भाडे करारपत्र |
| १४ | संस्थेकडे उपलब्ध असलेल्या पायाभूत सोईसुविधांची माहिती व त्यासंबंधातील कागदपत्रे (पहा परिशिष्ट २ ,३ व ४) |
| १५ | शासनाने ठरवून दिलेले नियम बंधनकारक असतील याबाबत संस्था प्रमुखांचे २०/- रुपयाच्या स्टॅम्प पेपरवर करारनामा.( पहा परिशिष्ट ८) |

***

# परिशिष्ट - ६

**स्वयंसेवी संस्थेच्या पदाधिका-यांबाबत माहिती**

| अ.क्र. | पदाधिकारी/हुद्दा | नांव व पूर्ण पत्ता (पीनकोड व दूरध्वनी क्रमांकासह) | वय | शिक्षण | जात | व्यवसाय |
|---|---|---|---|---|---|---|
| १ | २ | ३ | ४ | ५ | ६ | ७ |
| १ | अध्यक्ष | | | | | |
| | | | | | | |
| २ | उपाध्यक्ष | | | | | |
| | | | | | | |
| ३ | सचिव | | | | | |
| | | | | | | |
| ४ | कोषाध्यक्ष | | | | | |
| | | | | | | |
| ५ | सदस्य | | | | | |
| | | | | | | |
| ६ | सदस्य | | | | | |
| | | | | | | |
| ७ | सदस्य | | | | | |
| | | | | | | |
| ८ | सदस्य | | | | | |
| | | | | | | |
| ९ | सदस्य | | | | | |
| | | | | | | |
| १० | सदस्य | | | | | |
| | | | | | | |
| ११ | सदस्य | | | | | |
| | | | | | | |

ठिकाण शिक्का

दिनांक

## परिशिष्ट - ७

संस्थेमार्फत सुरु असलेल्या इतर उपक्रमाबाबत माहिती.

उदा.- केंद्र / राज्य शासनाच्या, समाजकल्याण, महिला व बाल कल्याण, आदिवासी कल्याण, अपंग कल्याण वा इतर क्षेत्रातील विना अनुदानित/अनुदानित प्रकल्पाबाबत माहिती द्यावी. प्रत्येक उपक्रमाच्या बाबतीत स्वतंत्र प्रपत्र जोडावे.

| **अ.क्र.** | **उपक्रम** | **माहिती** |
|---|---|---|
| १ | २ | ३ |
| १ | उपक्रमाचे नाव | |
| २ | उपक्रमांचा पत्ता | |
| ३ | केंद्र शासन /राज्य शासन/स्वयंसेवी संस्था/महिला बाल कल्याण संस्था यांचेकडून मदत घेतली आहे काय ? | |
| ४ | उपक्रमाची थोडक्यात माहिती | |
| ५ | उपक्रमाची या पूर्वी गेल्या ३ वर्षात तपासणी /वर्गीकरण /दंड इ. झाले असल्यास त्याची माहिती द्यावी. | |

***

# परिशिष्ट - ८

## २० रुपयाच्या स्टॅम्प पेपरवर करारनामा

| |
|---|
| २०/- रुपये |

**करारनामा लिहून देणार:**

अध्यक्ष श्री/श्रीमती ____________________

उपाध्यक्ष श्री/श्रीमती ____________________

सचिव श्री/श्रीमती ____________________
(संस्थेने अधिकार दिलेले कोणतेही पदाधिकारी संस्थेच्या ठरावासह)

संस्थेचे नांव व पूर्ण पत्ता ____________________
____________________

**करारनामा लिहून देणार :**

विशेष जिल्हा समाज कल्याण अधिकारी, जिल्हा __________________येणेप्रमाणे करारनामा लिहून देण्यात येतो की,

१. आश्रमशाळा बाबतचा प्रस्ताव________ ठिकाणचा असून हे ठिकाण बृहत् आराखडयात आहे, या प्रस्तावात पान क्र.१ ते______ पाने असून जोडपत्र ____ ते ____ आहेत. शासनाने आखून दिलेल्या परिशिष्ट १ ते ____ आणि इतर सर्व अटी आणि शर्ती मी / आम्ही वाचलेले असून त्या आम्हास पूर्णतः मान्य आहेत / असा उल्लेख असावा.

२. मान्यता प्राप्त आश्रमशाळेतील विद्यार्थ्यांना सर्व सोयी सवलती देणे आवश्यक असून त्या दिल्याबद्दल खात्री करण्यासाठी शासनाकडून त्रयस्थ संस्थेमार्फत संस्थेची तपासणी करण्यात येणार असून

त्याची श्रेणी निश्चित केल्या जाईल. निश्चित केल्या जावून पुढील मान्यतेबाबत कार्यवाही करण्यात येईल.

३. आमच्या संस्थेने नवीन प्राथमिक/माध्यमिक आश्रमशाळा सुरु करण्याकरिता विहीत नमुन्यात अर्ज केलेला आहे.

४. अर्जातील, परिशिष्टातील सर्व अटी व शर्ती माझ्या/आमच्या संस्थेस मान्य आहेत.

५. आश्रमशाळा चालविण्यास शासनाने परवानगी दिल्यास वरील अटी शर्तीनुसार निवासी आश्रमशाळेसाठी सर्व सोयी सुविधा दिलेल्या कालावधीत पूर्ण करण्याची हमी या करारपत्रकानुसार देण्यात येत आहे.

६. भविष्यात वेळोवेळी आश्रमशाळेबाबत शासन ज्या नवीन अटी व शर्ती वा निकष लागू करेल त्या अनुषंगाने कार्यवाही करणे आमच्या संस्थेवर बंधनकारक राहील.

७. शासनाकडून आश्रमशाळेकरिता जे अनुदान सूत्र निश्चित राहील त्या दराने काही कारणाने अनुदान न मिळाल्यास संस्था स्वतः खर्च करण्याचे मान्य करीत आहे.

८. आश्रमशाळेतील प्रवेशार्थी आणि आश्रमशाळेचा गुणात्मक दर्जा सातत्याने उत्कृष्ट श्रेणीचा राहील याबाबत या करारपत्राव्दारे हमी देण्यात येत आहे.

९. मी / आम्ही सर्व माहिती , सूचना , अटी व शर्ती काळजीपूर्वक वाचलेल्या असून त्यानुसारच अर्ज भरलेला आहे.

ठिकाण

दिनांक

| | | |
|---|---|---|
| करारपत्र लिहून देणार | करारपत्र लिहून घेणार | साक्षीदार |
| सही | सही | सही |
| शिक्का | शिक्का | नांव |
| नांव | नांव | पत्ता |
| पत्ता | पत्ता | |

***

## परिशिष्ट ९

## प्रतिज्ञापत्र

मी / आम्ही खाली सहया करणार श्री./श्रीमती ________________________________ ________________________________________________अध्यक्ष/ उपाध्यक्ष / सचिव / कार्याध्यक्ष म्हणून ______________________________ या संस्थेत पदाधिकारी आहे /आहोत. मी / आम्ही प्रतिज्ञापत्र लिहून देतो की, आमच्या संस्थेमार्फत __ __________ता.__________ जि. __________ येथे नवीन आश्रमशाळा मंजूरीबाबत प्रस्ताव सादर केलेला आहे, या प्रस्तावात अर्जातील एकूण पाने १ ते _____ असून, जोडपत्रे व इतर आवश्यक कागदपत्रे १ ते _____ आहेत. वर दिलेली सर्व माहिती खरी असून सोबत जोडलेली कागदपत्रे चुकीची किंवा खोटी आढळून आल्यास मी / आम्ही कायदेशीर कार्यवाहीस पात्र राहीन / राहू. तसेच मंजूर आश्रमशाळेची मान्यता रद्द होईल याची जाणीव आहे. त्याचप्रमाणे देण्यात आलेले अनुदान पूर्णपणे परत करण्याचे बंधन माझ्यावर / आमच्यावर राहील याची मला / आम्हाला जाणीव आहे.

**संस्थेच्या पदाधिका-यांची सही व शिक्का**

ठिकाण :-

दिनांक :-

********